# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### शिक्षण क्षेत्रातील गंभीर स्वरुपाच्या समस्यांचे तात्काळ निराकरण करण्याबाबत

**(१) २१५२७ (२३-०८-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिक्षण क्षेत्रातील गंभीर स्वरुपाच्या समस्यांचे तात्काळ निराकरण करण्याबाबत नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी दिनांक २३ मे, २०१६ रोजी व त्यापूर्वीसुद्धा अनेकवेळा निवेदने देऊन व चर्चा करुन समस्यांचे निराकरण करण्याची मागणी केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निवेदनात केलेल्या मागण्यांबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (१३-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे नाही.

(२) जनप्रतिनिधी यांचेशी चर्चा करुन संबंधित शिक्षणाधिकारी यांना कार्यवाहीचे निर्देश दिलेले आहे. शासन स्तरावरील मुदयांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ग्रामीण भागातील जिल्हा परिषदेच्या शाळांची दूरवस्था दूर करण्याबाबत

**(२) २५९०४ (१६-१२-२०१६). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिक्षण विभागाकडून करोडो रुपये खर्च करुन वेगवेगळया योजना राबविल्या जात आहेत, परंतु ग्रामीण भागातील बहुतांश शाळांच्या इमारतींची दूरवस्था झाली आहे, हे खरे आहे काय.

(२) असल्यास, ग्रामीण भागातील जिल्हा परिषदेच्या ६५८ प्राथमिक शाळांच्या १२९४ वर्ग खोल्या नादुरुस्त झाल्या असून सध्या त्या धोकादायक स्थितीत आहेत, हे ही खरे आहे काय.

(३) असल्यास, पालक वर्गाकडून वारंवार संबधितांकडे तक्रार करुनही दखल घेण्यात आली नाही, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२४-०७-२०१९) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

(२) नाही, हे खरे नाही. तथापि, सन २००० पूर्वी बांधण्यात आलेल्या राज्यातील सर्व जिल्हा परिषद शाळांच्या इमारतीचे स्ट्रक्चर ऑडीट करणे आवश्यक असल्याने विभागाकडून दिनांक ७ सप्टेंबर, २०१७ रोजी सर्व जिल्हा परिषद शाळेच्या इमारतीची तांत्रिक तपासणी करण्याबाबतच्या व शाळा दुरुस्ती व नवीन शाळा बांधकाम आराखडा अंदाजपत्रक तयार करुन विहित मार्गाने प्रस्ताव सादर करावे, अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

(३) व (४) अशा प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास दखल घेऊन योग्य उपाययोजना करण्यात येते.

---

## मालवण (जि.सिंधुदुर्ग) पंचायत समितीच्या विभागातील अनेक शाळांच्या इमारती धोकादायक असल्याबाबत

**(३) २६०९३ (१६-१२-२०१६). ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालवण (जि.सिंधुदुर्ग) पंचायत समितीच्या मासिक सभेत माहे ऑगस्ट, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान पार पडलेल्या सभेत शिक्षण, आरोग्य, दूरसंचार, रस्ते याबाबत घेण्यात आलेल्या अनेक ठरावांवर वर्ष उलटूनही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विभागातील अनेक शाळांच्या इमारती धोकादायक अवस्थेत आणि शाळा खोल्या मोठ्या प्रमाणावर गळक्या अवस्थेत असून जिल्हा परिषदेच्या बांधकाम विभागाचे याकडे दुर्लक्ष होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी सभेत मंजूर ठरावांचे संदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०७-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) पंचायत समितीच्या मासिक सभेतील सूचनाप्रमाणे शाळा दुरुस्तीची कामे मंजूर करण्यात आली असून ती पूर्ण झालेली आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विद्यार्थी व विद्यार्थ्यांकरीता वितरीत करण्यात येणाऱ्या वाहन परवानाची मर्यादा वाढविण्याबाबत

**(४) २७२४१ (१५-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य प्रादेशिक परिवहन विभागामार्फत राज्यातील १६ वर्ष पूर्ण झालेल्या व १८ वर्षे खालील वयाच्या विद्यार्थी व विद्यार्थींना वाहन परवाना देण्यात येतो, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर वाहन परवाना केवळ ५० अश्वशक्ती पर्यंतच्या वाहनांना लागू करण्यात आलेला असून प्रचलित वाहनांमध्ये एकही वाहन ५० अश्वशक्ती पर्यंत मर्यादित नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून १६ वर्ष पूर्ण झालेल्या व १८ वर्षे खालील वयाच्या विद्यार्थी व विद्यार्थ्यांकरीता वितरीत करण्यात येणाऱ्या वाहन परवान्यात सुधारणा करून त्याची मर्यादा १.०० अश्वशक्ती पर्यंत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२९-०७-२०१९)** : (१), (२) व (३) मोटार वाहन कायदा १९८८ च्या कलम ४ व कलम ९ नुसार १६ ते १८ वयोगटातील व्यक्तिस ५० सी.सी. इंजिन क्षमतेची दुचाकी वाहन चालविण्याची अनुज्ञप्ती काही अटींवर जारी करण्याची तरतुद आहे. सध्या नविन उत्पादित वाहनांमध्ये ५० सी.सी. क्षमतेपेक्षा कमी क्षमता असलेली दुचाकी वाहने उत्पादित केली जात नाहीत तथापि, यापूर्वी नोंदणी झालेली काही विशिष्ट उत्पादकांची वाहने ५० सीसी पेक्षा कमी क्षमतेची आहेत. केंद्र शासनाने सध्याच्या मोटार वाहन कायद्यातील विविध तरतुदीमध्ये सुधारणा करण्यासाठी मोटार वाहन (सुधारणा) विधेयक २०१६ प्रसिध्द केले आहे.

सदर विधेयकातील सुधारीत तरतुदींच्या अनुषंगाने १६ वर्ष पूर्ण झालेल्या व १८ वर्षाखालील वयाच्या विद्यार्थ्यांना १०० सी.सी. पर्यंत इंजिन क्षमता असलेली दुचाकी वाहने चालविण्याची परवानगी देण्याबाबत दि.२५/११/२०१६ च्या पत्रान्वये केंद्र शासनास विनंती करण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मालेगाव बॉम्ब स्फोटातील आरोपीस ठार केल्या प्रकरणाची निपक्षपाती चौकशी करणेबाबत

**(५) २८१४९ (१४-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मालेगाव बॉम्ब स्फोटातील आरोपी रामचंद्र कालसंग्रा आणि संदिप डांगे या दोघांना एटीएसच्या अधिकाऱ्यांनी डोळयादेखत गोळया घालून ठार केले असल्याने या प्रकरणाची निपक्षपाती चौकशी करण्याची मागणी कालसंग्राची

पत्नी व त्यांच्या कुटुंबियांनी दिनांक ०३ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आपल्या पतीला एटीएसच्या अधिकाऱ्यांनी धमकावून त्यांना मालेगाव खटल्यात खोटे पुरावे तयार करून नाहक अडकविल्याचा गंभीर आरोप कालसंग्राच्या पत्नीने केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू प्रकरणाची शासनाने उच्चस्तरावरून दखल घेवून दोषी एटीएस अधिकारी यांचेविरूध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०९-२०१९) :** (१) व (२) दिनांक २९/०९/२००८ रोजी भिकू चौक, मालेगाव येथे बॉम्ब स्फोट झाला. सदर गुन्ह्याचा तपास दहशतवाद विरोधी पथकाने दिनांक ३०/०९/२००८ ते दिनांक ३१/०३/२०११ पर्यंत केला. आरोपी रामचंद्र कालसंग्रा हा विष्णू पटेल हे नाव धारण करून सन २००९ मध्ये झारखंड मध्ये व सन २०१० मध्ये पश्चिम बंगाल मध्ये राहत असल्याचे तपासात दिसून आले. आरोपी रामचंद्र कालसंग्रा व संदिप डांगे यांना दहशतवाद विरोधी पथकाने कधीही चौकशीसाठी ताब्यात घेतले नव्हते. सदर गुन्ह्याचे दोषारोपपत्र मोक्का विशेष न्यायालय, मुंबई येथे दाखल केले आहे. सदर गुन्ह्याचा तपास दिनांक ०१/०४/२०११ पासून राष्ट्रीय तपास अभिकरण (एनआयए) कडे वर्ग करण्यात आला आहे. सध्या हे प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उस्मानाबाद जिल्हा बँकेतील ठेवीदारांना रक्कम उपलब्ध होण्याबाबत

**(६) ३१३१० (१९-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उस्मानाबाद जिल्हा बँकेतील ठेवीदार अनुसया पांढरे, जळकोट (ता.तुळजापूर) येथील रहिवासी सुनिता जाधव तसेच केसरजवळग येथील प्रमोद कांबळे यांना लग्न तसेच घरगुती वापराकरीता बँकेतील ठेवीचे पैसे मिळत नसल्याचे दिनांक २८ एप्रिल, २०१७ रोजी निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हा बँकेतील ठेवीदारांना त्यांचे स्वत:चे पैसे सहज व सुलभतेने मिळण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२०-०७-२०१९) :** (१) उस्मानाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेतील ठेवीदार अनुसया पांढरे, रा, जळकोट, ता.तुळजापूर यांचे बँकेच्या जळकोट शाखा येथे कोणत्याही प्रकारचे बचत खाते नाही. सुनिता जाधव यांचे जळकोट शाखेमध्ये बचत खात्यामध्ये रुपये २२,१६५/- होते, यापैकी त्यांना रुपये २१,०००/- अदा करण्यात आले. तसेच उस्मानाबाद जिल्हा बँक केसरजवळगा येथील श्री.प्रमोद कांबळे यांच्या बचत खात्यामध्ये रुपये ६,९८२.२० शिल्लक होते त्यापैकी त्यांना रुपये ५,९००/- अदा करण्यात आले.

(२) व (३) उस्मानाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने मोठ्या प्रमाणात बिगर शेती कर्ज वाटप केले असून त्यापोटी मोठ्या प्रमाणात NPA साठी तरतूद करावी लागली आहे. थकीत कर्जवसुली करण्यासाठी जिल्हा उपनिबंधक कार्यालयाने बँकेस निर्देश दिले आहेत.

---

## मुंबईत म्हाडाच्यावतीने काढण्यात आलेल्या सोडतीतील अर्जदारांना घराचा ताबा मिळणेबाबत

**(७) ३१४३० (११-०८-२०१७). ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २७५६२ ला दिनांक १५ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत म्हाडाच्यावतीने माहे मे, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान काढण्यात आलेल्या सोडतीतील संकेत क्रमांक ३१२ व संकेत क्रमांक ३१३ मध्ये पात्र ठरलेल्या सुमारे ३६७ अर्जदारांपैकी कोणालाही सदनिका वितरीत करण्यात आली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे,
(२) असल्यास, संकेत क्रमांक ३१३ गव्हाणपाडा, मुलुंड येथील अल्प उत्पन्न गटातील इमारतींना मुंबई महानगरपालिकेकडून भोगवटा प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे काय व केव्हा,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर अर्जदारांना घराचा ताबा मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राधाकृष्ण विखे-पाटील (११-१०-२०१९)** : (१) व (२) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांचेकडून प्राप्त अहवालानूसार, मुंबई मंडळाच्या दिनांक ३१ मे, २०१५ रोजी काढण्यात आलेल्या सोडतीमधील संकेत क्रमांक ३१२ व ३१३ गव्हाणपाडा, मुलुंड मधील ३६७ अर्जदारांपैकी ३४३ अर्जदार कागदपत्रांच्या पडताळणीअंती सदनिका मिळणेसाठी पात्र झालेले आहेत. यापैकी संकेत क्रमांक ३१२ मधील इमारतींना दिनांक २५/०१/२०१७ रोजी भोगवटा प्रमाणपत्र (O.C.) प्राप्त झालेले असून पात्र अर्जदारांना सदनिकेची किंमत अदा करणेसाठी तात्पुरते देकार पत्र (Provisional offer letter) देण्यात आलेले आहे. तसेच १२२ सदनिकाधारकांना सदनिका वितरीत करण्यात आलेल्या आहेत.

संकेत क्रमांक ३१३, मधील १८२ यशस्वी अर्जदारांपैकी १७३ अर्जदार पात्र ठरले असून उर्वरित ९ सदस्यांच्या पात्रता निश्चितीचे काम सुरु आहे. मात्र या संकेत क्रमांकातील इमारतींचे बांधकाम पूर्ण असले तरी अद्याप पर्यंत या योजनेलगतच्या तीन इमारतींचे बांधकाम प्रगतीपथावर आहे. तसेच सदरच्या बांधकाम ठिकाणी जुन्या संक्रमण शिबिरातील रहिवाश्यांनी त्यांचे गाळे वेळेत रिकामे न केल्यामुळे सदरहू नविन इमारतींचे बांधकाम उशीराने सुरु झाले. तथापि, एकूण पाच इमारतींचे सामाईक मल:निस्सरण व्यवस्था

तथा पावसाळी गटार व्यवस्था इत्यादींचे काम एकत्रितपणे पूर्ण करणे आवश्यक असून सदर काम पूर्ण झाल्यानंतरच महानगरपालिकेकडून भोगवटा प्रमाणपत्र (O.C.) प्राप्त होणार आहे. सदरहू १८२ सदनिकांसाठी भागश: भोगवटा प्रमाणपत्र प्राप्त करणेसाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे पाठपुरावा सुरु आहे असे म्हाडाच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विदर्भ इन्फोटेक्स प्रा.लि. या कंपनीला एक हजार चौरस फुटांची जागा मोफत देण्यात आल्याबाबत

**(८) ३५७४१ (०४-०१-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वाहतूक पोलिसांच्या मुख्यालयात चौथ्या मजल्यावर विदर्भ इन्फोटेक्स प्रा.लि. या कंपनीला एक हजार चौरस फुटांची जागा मोफत देण्यात आली असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पोलीस मुख्यालयात आधीच अधिकाऱ्यांना वावरण्याकरीता कमी जागा असताना एका खाजगी कंपनीला जागा देण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, ही जागा उक्त कंपनीला भाड्याने अथवा विनामूल्य देण्यापूर्वी नियमानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाची लेखी परवानगी घेण्यात आली आहे काय,
(४) नसल्यास, याप्रकरणी संबंधितांवर कायदेशीरपणे गुन्हे नोंदवून या कंपनीकडून जागा त्वरीत रिक्त करण्याबाबत शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२६-०७-२०१९) :** (१) हे खरे आहे.
वाहतूक पोलीस मुख्यालयामार्फत खाजगी टोईंग वाहनांवर नियंत्रण

ठेवण्याकरीता तसेच निरीक्षण केंद्र उभारणी करुन त्यांच्यावर देखरेख करण्यासाठी १,००० चौरस फुट जागा विदर्भ इन्फोटेक प्रा.लि. या कंपनीस व वाहतूक पोलीस यांना एकत्रितरित्या काम करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

(२) वाहतूक पोलीस मुख्यालयात जागेचे कमतरता आहे, हे खरे नाही.

वाहतूक पोलिसांकडून मुंबई शहरात वाहतुकीच्या नियमांचे कर्तव्य पार पाडण्यासाठी मोटार वाहन कायदा व नियमांची सतत अंमलबजावणी करावी लागते. मोटार वाहन कायदा, १९८९ कलम १२७(२) व (३) नुसार सार्वजनिक ठिकाणी / रस्त्यावर उभी असलेली वाहने, तसेच बेवारस वाहने टोईंग करण्याचा व त्याकरीता आवश्यक यंत्रणा उपलब्ध करुन घेण्याचा अधिकार पोलिसांना प्राप्त आहे. या अनुषंगाने मुंबई शहरातील वाहने टो करण्यासाठी मे.विदर्भ इन्फोटेक प्रा.लि. या कंपनीस कंत्राट देण्यात आलेले आहे. मुंबई शहरातील ३४ वाहतूक विभागांकरीता ८० टोईंग क्रेनची सेवा कंपनीने उपलब्ध करुन दिलेली असून, त्याच्या नियोजनाकरीता मुंबई वाहतूक मुख्यालयातील १,०००/- चौ.फुट जागा करारान्वये सदर कंपनीस उपलब्ध करुन देण्यांत आलेली आहे. यान्वये वाहतूक पोलीस आणि मे.विदर्भ इन्फोटेक प्रा.लि. या कंपनीच्या कामकाजात योग्य समन्वय राहात असून, शहरातील वाहतूक नियमन करणे सुलभ झालेले आहे.

(३) नाही.

(४) सदरची सेवा ही अतितात्काळ असल्याने, वाहतूक पोलीस मुख्यालयाकडून नमूद कंपनीस करार करुन देण्यात आलेली आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात तलाठी व सर्कल पदे नव्याने भरण्याबाबत

**(९) ३७५४४ (०३-०१-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शेतकऱ्यांना तलाठ्यांच्या मागे-मागे फिरावे लागू नये म्हणून

राज्यात १६ हजार नवीन चावडी कार्यालये बांधण्यात येणार असून ४ हजार तलाठी व ५०० सर्कल पदे नव्याने भरली जाणार असल्याची घोषणा मा.महसूल मंत्री यांनी कोल्हापूर जिल्ह्यातील गंगापूर येथे केली असल्याचे माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर घोषणेच्या पूर्ततेसाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०५-२०१९) :** (१) होय.
(२) महसूल व वन विभागाच्या दिनांक २५/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये ३१६५ नवीन वाढीव तलाठी साझे व ५२८ नवीन महसूली मंडळे स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. तलाठी व मंडळ अधिकारी कार्यालय एवं निवासस्थान बांधण्याची महसूल विभागाची योजना आहे. संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर निधी उपलब्धता व नविन दायित्व स्विकारायची मर्यादा यांच्या अनुषंगाने सदर इमारत बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही महसूल विभागाकडून करण्यात येते.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## धामणगाव रेल्वे (जि.अमरावती) येथे महसूल विभागाच्या कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थाने बांधण्याबाबत

**(१०) ४०९२५ (२६-०४-२०१३). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धामणगाव रेल्वे (जि.अमरावती) येथे महसूल विभागाच्या कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थाने बांधण्याच्या प्रस्तावावर मंजूरी मिळण्याबाबत मा.स्थानिक लोकप्रतिनिधींनी तहसिलदार धामणगांव रेल्वे (जि.अमरावती) यांना दिनांक २९ सप्टेंबर, २०१२ रोजी वा त्यादरम्यान लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवेदनावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१३-०५-२०१९) :** (१), (२) व (३) मा.स्थानिक लोकप्रतिनिधी यांचे दिनांक २९ सप्टेंबर, २०१२ रोजीचे कोणतेही निवेदन तहसिलदार, धामणगाव रेल्वे यांना प्राप्त झालेले दिसून येत नाही. तथापि, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांचेकडून धामणगांव रेल्वे (जि.अमरावती) येथे महसूल विभागाच्या कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थाने बांधण्याकरीता रुपये ५,१६,७५,१००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व नकाशे दिनांक १३/१२/२०१८ च्या पत्रासमवेत प्राप्त झाले आहे, सदर अंदाजपत्रक व नकाशे यांची छाननी झाल्यानंतर विभागाने स्वीकारावयाचे नवीन दायित्वाच्या मर्यादेत व निधी उपलब्धतेनुसार प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही करण्याचे संकल्पित आहे.

---

## औरंगाबाद जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागातील रिक्त पदे भरणेबाबत

**(११) ४१७६७ (०२-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागांतर्गत ५० प्राथमिक आरोग्य केंद्र व २७९ आरोग्य उपकेंद्र कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्हा परिषद आरोग्य विभागातील डॉक्टरसह इतर संबंधित कर्मचाऱ्यांची तीनशे पदे रिक्त असून वैद्यकिय अधिकारी गैरहजर राहत असल्याने ग्रामीण भागातील रुग्णांना वेळेवर उपचार मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०७-१०-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) अंशत: खरे आहे. डॉक्टर व कर्मचाऱ्यांची ३४२ पदे रिक्त आहेत. वैद्यकीय अधिकारी गैरहजर असल्यास नजिकच्या प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी तसेच बंधपत्रित वैद्यकीय अधिकारी नेमणूक करुन त्याचेमार्फत रुग्णांना सेवा दिली जाते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय वसतिगृहातील विद्यार्थीनीना निर्वाह भत्ता मिळणेबाबत

**(१२) ४१७७२ (०१-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त राज्यात मुलींसाठी नवीन ५० वसतिगृहे उभारली असून त्यात १२५०० विद्यार्थीनी राहत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासकीय वसतिगृहातील विद्यार्थीनीना प्रतिमहा रुपये ९०० निर्वाह भत्ता तर गणवेश व शैक्षणिक साहित्यासाठी वार्षिक रुपये ६५०० सामाजिक न्याय विभागाकडून दिले जातात, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मागील १० महिन्यापासून विद्यार्थीनीना निर्वाह भत्ता व शैक्षणिक साहित्यासाठी असणारा खर्च मिळाला नसून निर्वाह भत्ता व शैक्षणिक खर्चाची रक्कम वेळेवर मिळण्यासाठी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. सुरेश (भाऊ) खाडे (२३-०७-२०१९) :** (१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती निमित्त मागासवर्गीय मुलींसाठी ५० वसतिगृहे मंजूर करण्यात आली असून, त्यापैकी ४२ वसतिगृहे सुरू करण्यात आलेली आहेत.

या वसतिगृहाची मान्य विद्यार्थी संख्या ४८०० इतकी आहे.
(२) विभागीयस्तरावरील वसतिगृहातील विद्यार्थीनीस रुपये ८०० जिल्हास्तरावरील विद्यार्थीनीस रुपये ६०० तर तालुकास्तरावरील विद्यार्थीनीस रुपये ५००/- इतका निर्वाह भत्ता देण्यात येतो तर गणवेश व शैक्षणिक साहित्यासाठी रुपये ६५००/- इतकी रक्कम देण्यात येते.
(३) निर्वाह भत्ता व शैक्षणिक साहित्य वेळेवर मिळण्यासाठी शासनाकडून तरतूद उपलब्ध करून देण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील कांगणेवाडी ह्या तंटामुक्ती पुरस्कार प्राप्त गावातील वाद मिटविण्याबाबत

**(१३) ४२३९१ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) या तंटामुक्ती पुरस्कार प्राप्त गावात वैयक्तिक वादातून कांगणेवाडीवर जवळजवळ गत ७ वर्षे सामाजिक व धार्मिक बहिष्कार असल्याने सदर वाद शासनाने मध्यस्थी करून मिटवावा म्हणून दिनांक १३ जानेवारी, २०१८ रोजी मा.गृह राज्यमंत्री व मा.मुख्यमंत्री यांना लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निवेदनानुसार सदर वाद मिटावा व मा.न्यायालयाच्या आदेशानुसार रयत भागात शिमगोत्सव साजरा व्हावा म्हणून पोलिसांनी दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजी ग्राममंदिरात ऑन रेकॉर्डिंग गावकऱ्यांची बैठक घेवून अन्यायग्रस्त कांगणेवाडीत घरोघरी देवाची पालखी घेवून जाण्याचे बैठकीत कबूल करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर गावातील विरोधी गट बैठकीस उपस्थित न रहाता त्याच रात्री संपूर्ण गावाला वेठीस धरून ग्रामस्थांना जातपंचायतीचा धाक दाखवून सदरचा वाद मिटावा म्हणून प्रयत्न करणाऱ्या तक्रारदारांवरच दबाव आणण्यासाठी ८३ ग्रामस्थांच्या सह्या घेवून तक्रारदार गावात शांतता भंग करतो म्हणून खोटी तक्रार दाखल केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, तहसिलदार व पोलीस निरीक्षक यांनी दिनांक ३ मार्च, २०१८ रोजी शांतता कमिटीच्या बैठकीत पुढील दाद तुम्ही कोर्टाकडे मागावी असे तक्रारदारांना सांगण्यात आले असून सदर वाद मिटवण्यात तहसिलदार व पोलिसांना अपयश आले, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार अन्यायग्रस्त कांगणेवाडीला न्याय मिळवून देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१९) :** (१) होय.
(२), (३), (४) व (५) दिनांक ०६/१०/२०१८ व दिनांक ०७/१०/२०१८ रोजी देवरुख पोलीस ठाणे व तहसिल कार्यालय देवरुख येथे बैठक घेण्यात आली, त्यानंतर दिनांक १३/१०/२०१८ रोजी पोलीस दूरक्षेत्र साखरपा आणि पोलीस निरीक्षक, देवरुख पोलीस ठाणे यांच्या उपस्थितीत मौजे देवडे गावातील कांगणे व वडये या दोन्ही गटातील लोकांची एकत्रित बैठक घेण्यात येऊन पालखी संदर्भातील वाद संपूष्टात आणण्याची भूमिका स्पष्ट करण्यात आली. त्यानुसार सन २०१८ वर्षीच्या शिमगोत्सवात कांगणेवाडी ग्रामदेवता सामलिंगची पालखी घेऊन जाण्याच्या ठरावावर सर्व उपस्थित ग्रामस्थांनी सहमती दर्शवून स्वाक्षऱ्या केलेल्या आहेत. त्याप्रमाणे पालखी गावाच्या सहाणेवर येईल व त्यानंतर प्रथेप्रमाणे ज्या वाडीचा मान असेल, त्याप्रमाणे पुढील प्रत्येक दिवशी त्या-त्या वाढीतील ग्रामस्थांनी सहाणेवर येऊन आपापली ओटी भरावी, पालखी कोणाच्याही वाडीत अथवा घरी जाणार नाही, असे ठरले होते. त्यानुसार फक्त कांगणे गटातील ग्रामस्थ वगळता बाकी सर्व गावग्रामस्थांनी सहाणेवर येऊन पालखीची ओटी भरली आहे. त्याचप्रमाणे सन २०१९ चा शिमगा उत्सव देखील देवडे गावात शांततेत पार पडलेला आहे. सणाच्या कालावधीत कोणताही कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण झालेला नाही. गावात शांतता आहे.

---

## अनुसूचित जाती आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी वेतन व शाळा वेतनेतर अनुदान यांची स्वतंत्र लेखाशीर्ष तयार करणेबाबत

**(१४) ४३२३१ (०१-०८-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अनसुचित जातीच्या मुलांसाठी सन १९९६ साली १० प्राथमिक शाळा व ९ माध्यमिक शाळांना मान्यता दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर शाळामध्ये कार्यरत असणाऱ्या शिक्षकांना मिळत असलेले वेतन व शाळांना मिळत असले वेतनेतर अनुदान हे एकाच लेखाशीर्षाखाली केले जाते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर वेतन अनुदान व वेतनेतर अनुदान यांचे लेखाशीर्ष वेगवेगळे करणेबाबत शिक्षक संघटनांकडून मागणी करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर लेखाशीर्ष वेगवेगळे करणेबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. सुरेश (भाऊ) खाडे (२३-०७-२०१९) :** (१) होय.

(२) होय.

(३) होय.

(४) मार्च, २०१७ मध्ये या योजनेसाठी दोन स्वतंत्र लेखाशीर्ष तयार करण्यात आलेले आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्याच्या विविध विभागांवर महालेखापरीक्षकांनी (कॅग) कठोर शब्दात ताशेरे ओढल्याबाबत

**(१५) ४३५९९ (०२-०८-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील गोसीखुर्द सिंचन प्रकल्पापासून मुंबई महानगर प्राधिकरणापर्यंत आणि आरोग्य व्यवस्थेपासून पुण्याच्या ससून रुग्णालयापर्यंत राज्याच्या विविध विभागांवर महालेखापरीक्षकांनी (कॅग) कठोर शब्दात ताशेरे ओढले असल्याचे दिनांक ३० मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०९-०८-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) अर्थसंकल्पीय, पावसाळी व हिवाळी अधिवेशनामध्ये (जसे अहवाल प्राप्त होतात त्याप्रमाणे) भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे विविध अहवाल विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांच्या पटलावर वित्त विभागामार्फत सादर केले जातात. अहवाल सादर केल्यानंतर त्या अहवालाच्या (मराठी व इंग्रजी) प्रती सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे परिपत्रकासोबत आवश्यक त्या समयबध्द कार्यवाहीसाठी पाठविण्यात येतात. त्यातील आक्षेप / परिच्छेदांवर संबंधित प्रशासकीय विभागाने तीन महिन्याच्या आत महालेखापालांकडून (Vetting) संमत करुन घेऊन त्याबाबतचे स्पष्टीकरणात्मक ज्ञापने लोकलेखा समिती विधानमंडळ यांना परस्पर पाठविण्याबाबत सर्व मंत्रालयीन विभागांना परिपत्रकान्वये सूचना दिल्या जातात. अहवालामध्ये कोणत्या विभागाचे आक्षेप / परिच्छेद महालेखापालांनी उपस्थित केले आहेत, त्या आक्षेपावर त्या त्या विभागाने कार्यवाही करणे आवश्यक असते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# तळोदा (जि.नंदुरबार) येथील नगर भूमापन झालेल्या क्षेत्रांमध्ये एकाच मिळकतीसाठी महसूल व नगर भूमापन या दोन्ही यंत्रणा नोंद ठेवीत असल्याबाबत

**(१६) ४४०६६ (३०-११-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तळोदा (जि.नंदुरबार) येथील नगर भूमापन झालेल्या क्षेत्रांमध्ये एकाच मिळकतीसाठी महसूल व नगर भूमापन या दोन्ही यंत्रणा नोंद ठेवतात व तलाठ्याकडून अशा क्षेत्राचे सातबारे उतारे देण्यात येत असल्याची बाब माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तळोदा तालुक्यातील जुना सर्व्हे नं. २३२, नविन सर्व्हे नं. २३९ सन १९५१ पासून गावठाणात असून तेव्हापासून त्याचे सिटी सर्व्हे प्रॉपर्टी कार्ड (मिळकत पत्रिका) तयार आहेत मात्र त्याचे सात बारा उतारे बंद करण्यात आलेले नसून तलाठ्याकडून सातबारे उतारे देण्यात येतात, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासन परिपत्रकानुसार दिनांक ३० एप्रिल, २००६ पर्यंत कार्यवाही पूर्ण करून अहवाल सादर करावा असे आदेश असताना सदर बाबतीत १२ वर्षापेक्षा जास्त कालावधी लागत असल्याने याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०५-२०१९) :** (१) नगर भूमापन क्षेत्रातील बिनशेती झालेल्या व क्षेत्र आणि धारक मेळात असलेल्या मिळकतीबाबत गा.न.नं. सात बारा बंद करणेची कार्यवाही प्रगतीत असून उप अधिक्षक, भूमि अभिलेख, तळोदा यांच्या कार्यालयाकडून अशा पत्रा ठरणाऱ्या मिळकतीचा प्रस्ताव तहसिलदार, तळोदा यांच्याकडे दिनांक ०९/१०/२०१५ च्या पत्रान्वये पाठविण्यात आलेला आहे.

(२) व (३) तळोदा येथील जुना सर्व्हे नं. २३२, नवीन सर्व्हे नं. २३९ यास नगर भूमापन क्रमांक २९७६ ते २९८२ पडलेले दिसून येते. तथापी, सदर

क्षेत्राची बिनशेती झालेली नसल्याने गा.न.नं. ७/१२ देणे सुरू आहे.

सदर क्षेत्राच्या धारकांनी बिनशेती आकारणी करून घेतल्यास मिळकत पत्रिकेवर धारकांची नावे घेण्याबाबत योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महसूल विभागाद्वारे कंत्राटी तत्वावर नियुक्त विधी अधिकाऱ्यांच्या सेवा अटी शिथील करण्याबाबत

**(१७) ४४४९१ (३०-११-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व विभागीय आयुक्त कार्यालय व जिल्हाधिकारी कार्यालये येथे राज्य विवाद धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणी करता विधी अधिकारी कंत्राटी तत्वावर शासन निर्णय क्रमांक ६/४/२०११, ३०/६/२०११ व १४/११/२०१३ अन्वये नियुक्त करण्यात आलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महसूल विभागाद्वारे कंत्राटी तत्वावर नियुक्त विधी अधिकाऱ्यांच्या सेवा अटी शिथील करण्याच्या प्रस्तावाबाबत शासन विचाराधीन आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कंत्राटी तत्वावर नियुक्त विधी अधिकाऱ्यांच्या सेवा अटी शिथील करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०५-२०१९) :** (१) दिनांक ०६/०४/२०११ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक जिल्हाधिकारी कार्यालयात १ याप्रमाणे एकूण ३५ कंत्राटी विधी अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली. दिनांक ३०/०७/२०११ च्या शासन निर्णयान्वये या पदांच्या अटी व शर्ती निश्चित करण्यात आल्या. तसेच दिनांक १४/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक विभागीय आयुक्त कार्यालयात प्रत्येकी १ याप्रमाणे ६ कंत्राटी विधी अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत.

(२) व (३) कंत्राटी विधी अधिकाऱ्यांच्या सेवेतील अटी व शर्तीबाबत सर्व विभागीय आयुक्त व सर्व जिल्हाधिकारी यांचेकडून अभिप्राय मागविण्यात आले असून प्राप्त अभिप्रायांच्या आधारे प्रस्ताव तपासाधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील भूमि अभिलेख कार्यालयातील जमीन मोजणीची प्रकरणे प्रलंबित असल्याबाबत

**(१८) ४४५८१ (३०-११-२०१८). श्री.विप्लव बाजोरिया, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील भूमि अभिलेख कार्यालयातील सर्व्हर वारंवार डाऊन होऊन ऑनलाईन प्रक्रिया पूर्णत: बंद होत असल्यामुळे भूमि अभिलेख कार्यालयात शेतकरी, नागरिक तसेच व्यावसायिकांच्या मालकीच्या जागेची मोजणीची प्रकरणे प्रलंबित राहत असून शेतकरी, नागरिकांस पैसे भरुन जमिनीची मोजणी करावी लागत असल्याने आर्थिक भार सोसावा लागत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) राज्यात डिजिटल ७/१२ करण्याचा महत्वाकंक्षी प्रकल्प सर्व्हर आणि तांत्रिक अडचणीमुळे ७/१२ उतारा नागरीकांना मिळत नसल्याने पीक कर्ज, कृषी अनुदाने, औजारे-बियाणे खते वाटप, जमीन खरेदी-विक्री यासंबंधित अडचणींना सामोरे जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन डिजिटल ७/१२ उतारा मिळण्यास होत असलेल्या तांत्रिक अडचणी दूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०५-२०१९) :** (१) भूमि अभिलेख विभागात ई मोजणी आज्ञावली दिनांक ०१/०१/२०१२ पासून सुरू झालेली आहे. सदर ई मोजणी आज्ञावलीमध्ये माहे सप्टेंबर ते नोव्हेंबर, २०१८ मध्ये ऑनलाईन प्रक्रियेचे

सुधारणा करण्याचे काम चालू असल्यामुळे सर्व्हर धिम्या गतीने चालणे अथवा बंद पडणे अशा तांत्रिक अडचणी निर्माण झाल्या होत्या, त्यामुळे मोजणी प्रकरणे भरताना वेळ लागत होता.

परंतु सदर अडचणीबाबत राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांचेकडील मार्गदर्शनानुसार सदरच्या अडचणी दूर केलेल्या आहे. आता ई मोजणी आज्ञावली सुरळीत चालू आहे. सदर ई मोजणी आज्ञावली बंद असलेबाबत शेतकरी, नागरिक तसेच व्यावसायिकांच्या जागेची मोजणीची प्रकरणे प्रलंबित नाहीत अथवा अशा तक्रारी प्राप्त झालेल्या नाहीत. तसेच उपसंचालक, भूमि अभिलेख, अमरावती व नागपूर विभागात ई मोजणी आज्ञावलीचे सर्व्हर अखंडीत चालू आहे. त्यामुळे मोजणी अर्ज स्विकारण्याची प्रक्रिया बंद असलेबाबत कोठेही आढळलेली नाही.

(२) तांत्रिक अडचणीमुळे गैरसोय होऊ नये म्हणून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ च्या PDF प्रती डाऊनलोड करून ठेवण्याची सुविधा तलाठी यांच्या लॉगीनला उपलब्ध करून देण्यात आली आहे.

(३) http//mahabhulekh.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सर्व जिल्हयांचे गा.न.नं. ७/१२ पाहण्यासाठी उपलब्ध होत आहेत. त्याचबरोबर डिजिटल स्वाक्षरीयुक्त गा.न.नं. ७/१२ जनतेला डाऊनलोड करण्यासाठी http//aapleabhilekh.mahabhumi.gov.in/satbara या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले आहेत. सध्या ४६ लाख डिजीटल स्वाक्षरीत गा.न.नं. ७/१२ या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. सर्व्हरमधील तांत्रिक अडचणींमुळे गा.न.नं. ७/१२ नकलांच्या वितरणात गैरसोय होऊ नये म्हणून माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडील शासन निर्णयानुसार cloud वर डाटा shift करण्याची प्रक्रिया सुरू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्हयातील गावठाण आणि कोळीवाडे क्लस्टरमधून वगळण्याबाबत

**(१९) ४५६६५ (०५-१२-२०१८). श्री.रमेशदादा पाटील** : सन्माननीय **मुख्यमंत्री**

पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे जिल्ह्यातील गावठाण आणि कोळीवाडे क्लस्टरमधून वगळण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांनी घोषणा केली असतानाही ठाणे महानगरपालिकेच्या शहर विकास विभागाकडून गावठाण आणि कोळीवाड्यामधील नागरिकांना जनसुनावणीसाठी बोलाविले असल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने जनसुनावणी रद्द करण्याबाबत संबंधितांना निर्देश दिले आहे काय व त्यानुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-१०-२०१९) :** (१) नागरी पुन:रुत्थान योजनेचे नकाशे विकास आराखड्यात समाविष्ट करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील कलम ३७ ची कार्यवाही महानगरपालिकेने अनुसरली आहे. त्यातील तरतुदीनुसार नागरीकांनी दाखल केलेल्या हरकती/सुचनांवर सुनावणी देणे बंधनकारक असल्याने माहे जुलै, ऑगस्ट व ऑक्टोबर, २०१८ मध्ये ठाणे महानगरपालिकेकडून जन सुनावणी घेण्यात आली आहे.
(२) प्रारुप नागरी समूह पुनर्विकास आराखड्या मधील गांवठाण, कोळीवाडे यांचे क्षेत्र प्रलंबित ठेऊन एकूण ४४ नागरी समुहापैकी केवळ ६ नागरी समूह पुनर्विकास योजनेचे प्रस्ताव मान्यतेसाठी महानगरपालिकेकडून शासनास प्राप्त झाले आहेत. त्याबाबत शासनस्तरावर कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सावरगाव डुकरे (ता.चिखली, जि.बुलढाणा) येथील जमीन गैरव्यवहाराबाबत

**(२०) ४६४८५ (१८-१२-२०१८). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावरगाव डुकरे (ता.चिखली, जि.बुलढाणा) येथील गट नं. ४३ मधील जमीन क्षेत्र ०.७० हेक्टरात या जमिनीबाबत दिनांक २ ऑगस्ट, २००२ रोजी रितसर दुय्यम निबंधक चिखली, जि.बुलढाणा यांची रजिस्टर नोंदणी करण्यात आली असून सदर जमिनीच्या संदर्भात याच गावातील रहिवाशाने खोटी सावकारकीची तक्रार जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, बुलढाणा यांच्याकडे दिनांक २५ जानेवारी, २०१६ रोजी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रकरणी सहाय्यक निबंधक तथा सावकाराचे सहाय्यक निबंधक सहकारी संस्था, ता.चिखली, जि.बुलढाणा यांनी सावकारी सिध्द होत नाही असा अहवाल दिनांक १० डिसेंबर, २०१६ रोजी दिला आहे तसेच जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था बुलढाणा यांनीही दिनांक १० जानेवारी, २०१७ रोजी सावकारकी नसल्याचा अहवाला दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकरणी विभागीय सहनिबंधक सावकारी तथा विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, अमरावती यांनी जिल्हा उपनिबंधक, बुलढाणा यांना सावकारांचे जिल्हा उपनिबंधक तथा जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, बुलढाणा यांच्या दिनांक १२ ऑक्टोबर, २०१७ रोजीचा आदेश रद्द करण्यात आला, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, अपिल करण्याची मुदत असताना प्रांत अधिकारी, बुलढाणा तहसिलदार, मंडळ अधिकारी व तलाठी यांनी फेरफार व सातबाराच्या नोंदी बदलण्याची कार्यवाही केली आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने अधिक चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार या प्रकरणी जबाबदार असणाऱ्या संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०४-०९-२०१९) :** (१) व (२) होय.
(३), (४) व (५) अर्जदार श्री.शंतनु पाटील यांनी महाराष्ट्र सावकारी (नियमन) अधिनियम, २०१४ मधील कलम १८ नुसार फेरचौकशी करुन गैरअर्जदार श्री.प्रकाश पाटील यांनी मौजे सावरगांव डुकरे येथील गट क्र. ४३ मधील ७० आर क्षेत्राबाबतचे नोंदविलेले खरेदी दस्त रद्द करण्याची विनंती केली होती.

त्यानुषंगाने जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था बुलढाणा यांनी चौकशी करुन दिनांक १२/१०/२०१७ च्या आदेशान्वये सदर खरेदी खत अवैध घोषित करून रद्द केले.

जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बुलढाणा यांच्या वरील आदेशानुसार संबंधित तलाठी व मंडळ अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील तरतूदीनुसार फेरफार घेण्याची कार्यवाही केली.

गैरअर्जदार श्री.प्रकाश पाटील यांनी जिल्हा उपनिबंधक यांच्या दिनांक १२/१०/२०१७ च्या आदेशाविरुध्द विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, अमरावती यांचे कडे अपिल दाखल केले. त्यानुषंगाने विभागीय सहनिबंधकांनी त्यांच्या दिनांक २६/१०/२०१७ रोजीच्या आदेशान्वये जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बुलढाणा यांच्या आदेश रद्द केला व प्रकरणी फेरनिर्णय घेण्याचे आदेश दिले. त्यानुषंगाने जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था बुलढाणा यांच्यास्तरावरुन पुढील कार्यवाही सुरु आहे. दरम्यान गैरअर्जदार श्री.प्रकाश पाटील यांनी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बुलढाणा यांचे आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल केली असून सद्य:स्थितीत प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

---

## शासकीय महाविद्यालयांच्या प्राध्यापकांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार लाभ मिळणेबाबत

**(२१) ४६४८७ (०९-०४-२०१९). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.अनिकेत तटकरे, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी महाविद्यालयांमध्ये कार्यरत पात्र प्राध्यापकांना (Associate Professor) सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींमध्ये अंतर्भूत C.A.S. (करिअर ॲडव्हान्समेंट स्किम) नुसार (ग्रेड पे) रुपये १०,०००/- वेतनश्रेणीचे लाभ देण्यात आलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील शासकीय महाविद्यालयांमध्ये कार्यरत पात्र प्राध्यापकांना (Associate Professor) CAS नुसार लाभ देण्यात आले आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अशासकीय व शासकीय पात्र प्राध्यापकांना समान न्याय देवून शासकीय प्राध्यापकांना वेतनश्रेणीचा लाभ देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, शासकीय महाविद्यालयांमधील पात्र प्राध्यापकांना देय लाभापासून वंचित ठेवण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०८-२०१९) :** (१) होय.
(२) नाही.
(३) शासन निर्णय दिनांक ८/०३/२०१९ अन्वये राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नित अशासकीय महाविद्यालये तसेच शासकीय महाविद्यालये/संस्था यांमधील अध्यापकांना ७ वा वेतन आयोग लागू करण्यात आला आहे. सदरहू शासन निर्णयातील ७.४ (B)(IV) अन्वये सहयोगी प्राध्यापकांना कॅस अंतर्गत प्राध्यापक पदावर पदोन्नतीचे लाभ देण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे.
(४) शासकीय महाविद्यालये/संस्था यांमधील प्राध्यापक पदाचे सेवाप्रवेश नियम दिनांक ४/०८/२००७ रोजी विहित करण्यात आले असून सदर सेवाप्रवेश नियमांनुसार शासकीय महाविद्यालये / संस्था यांमधील प्राध्यापक हे पद १००% सरळसेवेने भरण्याची तरतूद होती. तथापि, तद्नंतर विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दिनांक ३०/०६/२०१० च्या अधिसूचनेमध्ये प्राध्यापक या पदावर पदोन्नतीद्वारे व नामनिर्देशनाने करावयाच्या नियुक्त्या या ७५:२५ या गुणोत्तरात करण्यात येतील, अशी तरतूद केली आहे. त्यानुसार प्राध्यापक पदाचे सुधारित सेवाप्रवेश नियम तयार करण्याची कार्यवाही विभागाकडून सुरु आहे.

---

## राज्यातील अति महत्वाच्या व्यक्तींच्या निधनानंतर त्यांचे शासकीय इतमामात अंत्यसंस्कार करण्याबाबत

**(२२) ४६६५० (०६-०७-२०१९). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **राजशिष्टाचार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अति महत्वाच्या व्यक्तींच्या निधनानंतर त्यांच्यावर शासकीय इतमामात अंत्यसंस्कार करण्याबाबत शासन धोरण तयार करीत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त धोरणाचे थोडक्यात स्वरुप काय आहे तसेच धोरण त्वरीत अंमलात आणण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२५-०७-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही,

"राष्ट्रपती, पंतप्रधान, माजी राष्ट्रपती व राज्यपाल यांचे निधन झाल्यानंतर त्यांचेवर शासकिय इतमामात अंत्यसंस्कार करण्याच्या संदर्भात केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने सूचना दिलेल्या आहेत." राज्य शासनाची याबाबत स्वतंत्र नियमावली नसून केंद्र शासनाच्या सूचनांनुसार कार्यवाही केली जाते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद महानगरपालिका क्षेत्रातील मराठी माध्यमांच्या सर्व शाळांना निवासी दराने मनपाचे कर लागू करणेबाबत

**(२३) ४६६९६ (१२-०७-२०१९). श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे, श्री.सतिश चव्हाण, श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद महानगरपालिकेचे महापौर, उपमहापौर व आयुक्त यांच्या समवेत औरंगाबाद शहरातील मराठी व उर्दू माध्यमाच्या अनुदानित शाळांना करातून सवलत दयावी या मागणीसाठी मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांच्या सह शाळेच्या संस्था चालकांची एक बैठक घेण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर बैठकीत शाळेच्या संस्था चालकांनी केलेल्या मागणीचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन औरंगाबाद महानगरपालिकेने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०७-२०१९) :** (१) शैक्षणिक संस्थांना मालमत्ता करातून सूट देण्याबाबत शैक्षणिक संस्थेच्या प्रतिनिधींनी दिनांक ६/०६/२०१६ रोजीच्या निवेदनाद्वारे अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा/ लोकसभा सदस्य औरंगाबाद/ विधानसभा सदस्य यांना विनंती केली होती.

सदर मागणीच्या अनुषंगाने चर्चा करण्याकरीता आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महापौर, उपमहापौर, विधानसभा सदस्य, उपायुक्त, वॉर्ड अधिकारी व शैक्षणिक संस्था चालक यांच्या समवेत दिनांक १३/०६/२०१६ रोजी बैठक घेतली, ही वस्तुस्थिती आहे.

(२) औरंगाबाद शहरातील मराठी, उर्दू माध्यमांच्या शाळांना महानगरपालिकेच्या कलम १३२(१) ब अन्वये मालमत्ता करात सवलत द्यावी अशी मागणी सदर निवेदनाद्वारे केली आहे.

(३) सदर मागणीच्या अनुषंगाने, औरंगाबाद महानगरपालिकेचे दिनांक ३०/१२/२०१६ च्या कार्यालयीन आदेशान्वये शैक्षणिक संस्थेच्या मालमत्ता कराचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी मुख्य लेखापरिक्षक औरंगाबाद महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली.

समितीची बैठक दि.०८/१२/२०१७ मध्ये घेण्यात आलेली असून, औरंगाबाद महानगरपालिकेच्या ठराव क्र.५१०/ई दि.०७/२/२०१४ अन्वये संमत

केलेल्या ठरावानुसार शैक्षणिक संस्थांना करण्यात आलेली कर आकारणी योग्य असून त्यामध्ये कोणताही बदल करता येणार नाही, असा समितीने निर्णय घेतला असून त्याप्रमाणे पुढील कार्यवाही करण्यात येत असल्याचे औरंगाबाद महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हंगाम २०१८-१९ मधील जिनिंग प्रेसिंग दराबाबत

**(२४) ४६७६१ (०६-०७-२०१९). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सी.सी.आय.चे अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, अध्यक्ष जिनिंग प्रेसिंग असोसिएशन, अध्यक्ष, कॉटन असोसिएशन ऑफ इंडिया, कापूस पणन महासंघाचे अधिकारी यांच्या समवेत प्रधान सचिव, पणन यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १२ नोव्हेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास बैठक आयोजित करण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या बैठकीत हंगाम २०१८-१९ करीता कापूस खरेदीसाठी सी.सी.आय.ने निर्धारित केलेल्या जिनिंग प्रेसिंग दराबाबत वाटाघाटी करण्यात आल्या असून सन २०१८-१९ मध्ये जिनिंग प्रेसिंगचे किती दर ठरविण्यात आले आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (३०-०७-२०१९) :** (१) होय.
(२) रुपये ९८५ प्रति गाठ (कापड व लोखंडी पट्टीसह). दिनांक १२/११/२०१८ रोजी सीसीआय, जिनिंग व प्रेसिंग असोसिएशनचे अध्यक्ष व प्रधान सचिव (पणन) यांच्या संयुक्त बैठकीत रुपये ९८५ प्रति गाठ (कापड व लोखंडी पट्टीसह) इतका दर निश्चित करण्यात आला आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वाडा शहराच्या नगरपंचायतीच्या मुख्याधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(२५) ४६८४९ (१२-०७-२०१९). श्री.आनंद ठाकूर, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाडा नगरपंचायतीचे रस्ते, पाणी, रोजगार, मोकाट गुरांचा प्रश्न तसेच कचरा व्यवस्थापनाबरोबर बांधकामे बंद पडल्यामुळे रोजगाराचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वाडा नगरपंचायतीची विकास कामे प्रलंबित ठेवणाऱ्या मुख्याधिकाऱ्यांविरोधात वाडावासियांनी तहसिल कार्यालयासमोर माहे मार्च, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान लाक्षणिक उपोषण केले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तदनुसार संबंधित मुख्याधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-१०-२०१९) :** (१) अशा आशयाच्या तक्रारी नगरपंचायत प्रशासनास प्राप्त झाल्याची वस्तुस्थिती नगरपंचायतीने कळविली आहे.

(२) हे खरे आहे.

तथापि, मुख्याधिकारी, वाडा नगरपंचायत यांनी स्वत: उपोषणकर्त्यांशी संवाद साधून त्यांना उपोषणापासून परावृत्त केले असल्याचे वाडा नगरपंचायतीने कळविले आहे.

(३) मुख्याधिकारी, वाडा नगरपंचायत यांच्याविरुध्द प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, पालघर यांचेमार्फत चौकशी करण्यात आली आहे.

याबाबतच्या चौकशी अहवालाच्या तसेच, शासनस्तरावर यासंदर्भात घेतलेल्या सुनावणीच्या अनुषंगाने मुख्याधिकारी, वाडा नगरपंचायत यांची अकार्यकारी पदावर बदली करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## डहाणू (जि.पालघर) शहरात अग्निशमन यंत्रणा अपुरी असल्याबाबत

**(२६) ४६८६५ (१२-०७-२०१९). श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डहाणू शहर व डहाणू गाव या भागात वसाहती वाढत असून लोकसंख्येच्या तुलनेत ५० हजार लोकसंख्येमागे अग्निशमन दलाचे एक पथक असावे असा नियम असतानाही डहाणू शहरासह डहाणू गावात अग्निशमन यंत्रणा अपुरी असल्याची बाब माहे मार्च, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने डहाणू शहरात व डहाणू गावात अग्निशमन यंत्रणा राबविण्याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२५-०७-२०१९) :** (१) व (२) सन २०११ च्या जनगणनेनुसार डहाणू या “ब” वर्ग नगरपरिषदेसाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत एसएस - ३ प्रकारचे अग्निशमन केंद्र असून सद्य:स्थितीत डहाणू या शहरासाठी पुरेसे असल्याचे डहाणू नगरपरिषदेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## समाजकल्याण विभाग (जि.यवतमाळ) यांच्यामार्फत चालविण्यात येणाऱ्या वसतिगृहांना सोयी-सुविधा पुरविण्याबाबत

**(२७) ४६९८७ (१०-०२-२०१४). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.सतीश चव्हाण :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यात समाजकल्याण विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या वसतिगृहात सोयी-सुविधांचा अभाव असल्याने माहे ऑगस्ट, २०१३ मध्ये वा

त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर समाजकल्याण विभागाच्या वसतिगृहांना सोयीसुविधा पुरविणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ.सुरेश (भाऊ) खाडे (२५-०७-२०१९) :** (१) नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) वसतिगृहांतील विद्यार्थ्यांना सोयी-सुविधा पुरविण्यात येत असून तक्रारीचे वेळीच निराकरण करण्यात येऊन प्रवेशित विद्यार्थी सोई-सुविधा पासून वंचित राहणार नाही याची दक्षता घेण्यात येते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लोहा (जि.नांदेड) तालुक्यात सन २०१६ च्या अतिवृष्टीमुळे बाधितांना अनुदान देण्याबाबत

**(२८) ४७२७० (०५-०७-२०१९). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) लोहा (जि.नांदेड) तालुक्यात अतिवृष्टी २०१६ चे अनुदान वाटप सुरु असून यासाठी सन २०१६ मध्ये लाभ न घेतलेल्या शेतकऱ्यांकडून स्वघोषणापत्र भरुन घेतले जात असल्याचे दिनांक ३/०१/२०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यामध्ये दुष्काळ व नैसर्गिक आपत्ती असेल तरच लाभ मिळेल ही अट घालण्यात आली असल्याने विमा लाभधारक शेतकऱ्यासाठी सदरहू अट अन्यायकारक असल्याने येथील माळाकोळी परिसरातील शेतकऱ्यांनी नांदेड-लातूर रस्त्यावर चक्काजाम आंदोलन केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदरहू अट शिथिल करुन सर्वच शेतकऱ्यांना सरसरकट अनुदान वाटप करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०३-१०-२०१९) :** (१), (२) व (३) नांदेड जिल्हयात माहे जून ते सप्टेंबर, २०१६ या कालावधीत अतिवृष्टी व पूरपरिस्थितीमुळे शेतीपिके/फळपिकांचे नुकसान झाल्याचे दिसून आले. शासन निर्णय दिनांक ०९/०१/२०१७ अन्वये माहे जून ते ऑक्टोबर, २०१६ या कालावधीत अतिवृष्टी व पूरपरिस्थितीमुळे बाधित झालेल्यांना मदत देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयान्वये अनुदान देत असताना ज्या शेतकऱ्यांनी पीक विमा काढलेला आहे अशा शेतकऱ्यांना पीक विमा कंपनीमार्फत व ज्या शेतकऱ्यांनी प्रधानमंत्री पीक विमा उतरविलेला नाही अशा शेतकऱ्यांना पीक विमा योजनेंतर्गत मंडळनिहाय भरपाईची जी रक्कम देय असेल त्या रकमेच्या ५० टक्के रक्कम शासनाकडून मदत म्हणून देण्यात येईल अशी तरतूद करण्यात आली आहे.

नांदेड जिल्हयातील लोहा तालुक्यात माहे जून ते ऑक्टोबर, २०१६ मधील अतिवृष्टीमुळे बाधित झालेल्या व पीक विमा न काढलेल्या शेतकऱ्यांना रुपये २६.५४ कोटी रुपये वितरीत करण्यात आले आहेत. सदर अनुदान केवळ अतिवृष्टीमुळे बाधित झालेल्या व पीक विमा न काढलेल्या शेतकऱ्यांना देय होते. सबब, दोन्ही प्रकारचे लाभ एकाच खातेदारास होऊ नयेत म्हणून तालुक्यातील विविध बँकाकडून संबंधित कालावधीत पीक विमा काढलेल्या खातेदारांची माहिती घेण्यात आली व पीक विमा न काढलेल्या खातेदारांकडून त्यासंदर्भात हमीपत्र घेण्यात आले.

दुष्काळ व नैसर्गिक आपत्ती असेल तरच लाभ मिळेल ही अट घालण्यात आली असल्याने विमा लाभधारक शेतकऱ्यासाठी सदरहू अट अन्यायकारक असल्याने येथील माळाकोळी व परिसरातील शेतकऱ्यांनी नांदेड-लातूर रस्त्यावर चक्काजाम आंदोलन केल्याचे निदर्शनास नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जव्हार नगरपरिषद (जि.पालघर) येथे आदिवासी सृष्टी प्रकल्प उभारण्याबाबत

**(२९) ४७३४२ (१२-०७-२०१९). श्री.रविंद्र फाटक : तारांकित प्रश्न क्रमांक ४५४४१ ला दिनांक २८ नोव्हेंबर, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जव्हार नगरपरिषद (जि.पालघर) येथे आदिवासी सृष्टी प्रकल्प उभारण्याच्यादृष्टीने प्राकलन आराखडे, खर्च विषयक बाबी तसेच इतर अनुषंगिक बाबींचा प्रस्ताव तयार करण्याची कार्यवाही सुरू आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रस्ताव तयार करण्याची सुरु असलेली कार्यवाही केव्हापर्यंत पूर्ण होणे अपेक्षित आहे, तसेच उक्त प्रस्तावांचे स्वरुप काय आहे, प्रस्तावावर केव्हापर्यंत अंमलबजावणी होणे अपेक्षित आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०८-२०१९) :** (१) व (२) जव्हार शहरातील जुन्या राजवाड्यामध्ये आदिवासी कला व संस्कृती यांचे प्रदर्शन घडविणाऱ्या दालनाची निर्मिती करण्याच्या अनुषंगाने "आदिवासी सृष्टी प्रकल्प" निर्माण करण्याबाबत जव्हार नगरपरिषदेने ठराव मंजूर केला आहे.

यानुषंगाने पुढील कार्यवाहीची तजवीज जव्हार नगरपरिषदेमार्फत ठेवण्यात आलेली आहे, असे नगरपरिषदेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुक प्रक्रिया दरम्यान झालेल्या गैरसोयीची चौकशी करण्याबाबत

**(३०) ४७५०९ (१०-०७-२०१९). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुकीच्या कामात महिला व पुरूष शिक्षक कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिग्रहीत करण्यात येवून निवडणूक प्रक्रिया पूर्ण

होईपर्यंत जवळपास ३ दिवस त्यांना मतदान केंद्रावर रहावे लागते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर विभागातील अनेक मतदान केंद्रावर महिला कर्मचाऱ्यांच्या निवासाची व वाहतुकीची गैरसोय झाली असून मतदान केंद्रावर पंखे, कुलर, पिण्याच्या पाण्याची व भोजनाची कोणतीही व्यवस्था नसल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, निवडणुकीच्या कामात शासनाकडून व्यवस्थापन प्रक्रियेत झालेल्या निष्काळजीपणाची चौकशी करण्याची मागणी महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षक समितीतर्फे तसेच महाराष्ट्र राज्य शिक्षक परिषदेतर्फे शासनास निवेदन देवून करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०८-२०१९) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## संजय गांधी राष्ट्रीय उद्यान मुख्य प्रवेशद्वार सुशोभिकरण करण्याकरीता निधी उपलब्ध करण्याबाबत

**(३१) ४७५८५ (०५-०७-२०१९). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई उपनगरातील संजय गांधी राष्ट्रीय उद्यान मुख्य प्रवेशद्वार सुशोभिकरण करण्याकरीता निधी उपलब्ध करण्यासंदर्भात महसूल व वन विभाग यांनी दिनांक २० डिसेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास मुख्य वन संरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांना कार्यवाही

करुन कार्यवाहीचा अहवाल सादर करण्याचे आदेश दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या संदर्भात मुख्य वन संरक्षक व संचालक यांनी कोणती कार्यवाही केली व कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर केला आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१९-०८-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) सन २०१६ मध्ये संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यास आंतरराष्ट्रीय दर्जाचे पर्यटन स्थळ विकास करणेकामी सल्लागार नेमणूक व सदर कामाची निविदा प्रक्रिया पूर्ण करण्यात आली आहे. सदर प्रस्तावामध्ये संजय गांधी राष्ट्रीय उद्यान मुख्य प्रवेशद्वार सुशोभिकरण करणे हे काम देखील समाविष्ट आहे. त्या अनुषंगाने आवश्यक ती पुढील कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पालोरा (ता.मोहाडी, जि.भंडारा) येथील जिल्हा परिषद प्राथमिक शाळेतील व्यवस्थापन समितीने अध्यक्ष पदाची फेरनिवड नियमबाह्य केल्याबाबत

**(३२) ४७५३४ (१७-०१-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय ग्रामविकास मंत्री पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पालोरा (ता.मोहाडी, जि.भंडारा) येथील जिल्हा परिषद प्राथमिक शाळेतील व्यवस्थापन समितीने अध्यक्षांची फेरनिवड नियमबाह्य करण्यात आल्याने निवड रद्द करण्याबाबत पालकांनी संबंधितांकडे माहे ऑगस्ट, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान मागणी करण्यात आल्याचे आढळून आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व नियमबाह्य निवडणूक करणाऱ्याविरुध्द कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२४-०७-२०१९) :** (१) व (२) होय, चौकशी करण्यात आलेली आहे.

(३) संबंधित मुख्याध्यापकास कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली. त्याबाबत, त्यांनी खुलासा सादर केला असून सदर प्रकरणी संबंधित मुख्याध्यापकाला सक्त ताकीद देण्यात आली.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील ग्रामीण भागातील शाळांमध्ये शारीरिक शिक्षण विषयाची अंमलबजावणी करण्याबाबत

**(३३) ४७५६२ (०५-०७-२०१९). डॉ.वजाहत मिर्झा, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.अमरनाथ राजूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण भागातील शाळांमध्ये शारीरिक शिक्षण विषयाची अंमलबजावणी केली जात नसल्याचे माहे मार्च, २०१९ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्‌नुसार राज्यातील ग्रामीण भागातील शाळांमध्ये शारीरिक शिक्षण विषयाची योग्य अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (२९-०७-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात कायम विनाअनुदान धोरणापूर्वीच्या वरीष्ठ महाविद्यालयांना अनुदान देण्याबाबत

**(३४) ४७७०४ (०५-०७-२०१९). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.किशोर दराडे, डॉ.सुधीर तांबे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २००१ पासून वरीष्ठ महाविद्यालयांना कायम विनाअनुदान धोरण लागू केले असून सन २००१ पूर्वी मान्यता मिळालेल्या काही वरीष्ठ महाविद्यालयांना जुन्या नियमानुसार अनुदान वेतन मिळाले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील कायम विनाअनुदान धोरण लागू होण्यापूर्वीच्या ५३ वरिष्ठ महाविद्यालयांना अनुदान दयावे यासाठी माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान उपोषण करण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त वरिष्ठ महाविद्यालयांना वित्त विभागाशी चर्चा करून अनुदान देण्याबाबत कार्यवाही केली जाईल असे उच्च शिक्षण विभागाने आश्वासित केले होते, हे खरे आहे काय,

(४) तसेच राज्यात सन २००१ पूर्वी कायम अनुदानित तत्वावरील महाविद्यालयांना शासनाने मंजुरी दिली असून सदर कायम अनुदानित तत्वावरील महाविद्यालयांना मान्यता देणे केव्हा सुरु झाले, सन २००१ नंतर महाविद्यालयांना अनुदान देणे बंद झाले असल्यास सन २००१ पूर्वी किती महाविद्यालये आहेत व त्यांना शासन अनुदान देणार आहे काय, सन २०१९-२० मध्ये किती महाविद्यालयांना अनुदान देण्यात आले ?

**श्री.विनोद तावडे (०१-१०-२०१९) :** (१) व (२) राज्यामध्ये दिनांक १७/०५/२००१ पासून कायम विनाअनुदान तत्वाचे धोरण लागू करण्यात आलेले आहे. त्यानंतर मान्यता दिलेल्या ५३ वरिष्ठ महाविद्यालयांना अनुदान मंजूर करण्याबाबत महाराष्ट्र राज्य कायम विनाअनुदानित वरिष्ठ महाविद्यालय

प्राध्यापक व कर्मचारी संघटना यांनी सप्टेंबर, २०१७ मध्ये उपोषण केले होते.

(३) कायम विनाअनुदान तत्वाच्या धोरणानंतर मान्यता दिलेल्या ५३ वरिष्ठ महाविद्यालयांच्या संदर्भातील वस्तुस्थिती वित्त विभागाच्या अवलोकनार्थ सादर करण्यात आली होती. वस्तुस्थिती विचारात घेता या महाविद्यालयांना अनुदान अनुज्ञेय होत नसल्याची बाब त्यांनी कायम केली आहे.

(४) दिनांक १७/०५/२००१ पासून कायम विनाअनुदान धोरण लागू करण्यात आले आहे. या धोरणानंतरच्या महाविद्यालयांना अनुदान देण्याचा धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला नाही.

---

## जलसंधारण विभागाने तयार केलेल्या जल आराखड्यामध्ये अनेक त्रुटी आढळल्याबाबत

**(३५) ४७७४८ (०५-०७-२०१९). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या जलसंधारण विभागाने तयार केलेल्या समन्यायी पाणी वाटपासंदर्भात जल आराखड्यामध्ये अनेक त्रुटी आढळल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर पाणी वाटपासंदर्भात जल आराखड्यामध्ये दुष्काळी भाग दर्शविण्यात आला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन जल आराखड्यामध्ये सुधारणा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०५-१०-२०१९) :** (१) नाही, तसेच सदर एकात्मिक राज्य जल आराखडा हा जलसंपदा विभागाने तयार केलेला असून राज्य जल परिषदेने मंजूर (दिनांक ११/०२/२०१९) केलेला आहे.

(२) नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) राज्य जल परिषदेच्या (सहाव्या) बैठकीच्या इतिवृत्तातील Directives of State Water Council regarding Integrated State Water Plan अन्वये “एकात्मिक राज्य जल आराखडा मंजूर झाल्यानंतर काही अडचणी / त्रुटी उद्भवल्यास त्यानुषंगाने राज्य एकात्मिक जल आराखड्यात सुधारणा / बदल करण्याबाबतची कार्यपध्दती विषद करण्यात आली आहे. त्यानुसार एकात्मिक राज्य जल आराखड्यात बदल करण्यासाठी संबंधित नदी खोऱ्यांच्या जल आराखड्यात सुधारणा / बदल करुन राज्य जल मंडळाची मान्यता घेतल्यानंतर सदरील प्रस्ताव राज्य जल परिषदेच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावा. नदी खोरे आराखड्यातील अशी सुधारणा राज्य जल परिषदेने मान्य केल्यानंतर ती एकात्मिक राज्य जल आराखड्यातही सुधारणा / बदल झाले असे समजण्यात येईल.” उपरोक्त तरतुदीनुसार दुरुस्ती प्रस्ताव संबंधित नदी खोरे अभिकरणाकडून प्राप्त झाल्यास राज्य जल परिषदेस दुरुस्ती प्रस्ताव मान्यतेस ठेवता येईल.

---

## कोलाड-रोहा येथे निवडणुकी दरम्यान जप्त करण्यात आलेल्या मद्य व रकमेच्या तक्रारीबाबत

**(३६) ४७७९७ (१०-०७-२०१९). श्री.अनिकेत तटकरे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोलाड (जि.रायगड) येथे निवडणूक आचारसंहिता दरम्यान एका राजकीय पक्षाच्या रोहा तालुका युवा मोर्चाच्या अध्यक्षाला त्याच्या वाहनात रक्कम व मद्याच्या बाटल्या मिळाल्याने अटक करण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या युवा मोर्चाच्या अध्यक्षाला जामीनावर सोडण्यात आले तसेच या तपासणीवेळी रोख रक्कम मिळूनही प्रशासनाने जाणीवपुर्वक त्याची तक्रारीमध्ये नमूद केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त तपासणी दरम्यान मिळालेला मद्याचा साठाही कमी

दाखवून या युवा मोर्चा अध्यक्षाला अप्रत्यक्षरित्या मदत केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नसार कोणती कार्यवाही वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) सदर प्रकरणी कोलाड पोलीस ठाणे येथे प्रोव्ही.गु.र.नं.३३/२०१९ महा.प्रोव्ही.कायदा कलम ६५(ई), ८३ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. सदर गुन्ह्यामध्ये एका राजकीय पक्षाच्या रोहा तालुका युवा मोर्चाचे अध्यक्ष व त्यांचा साथीदार यांना अटक करण्यात आली आहे. सदर गुन्ह्याच्या तपासात आरोपींकडून मिळून आलेला मद्याचा सर्व साठा पंचाचे समक्ष जप्त करण्यात आलेला आहे. सदर गुन्ह्यात आरोपींविरुध्द पुरावा सिध्द झाल्याने मा.न्यायालयात त्यांच्याविरुध्द दोषारोपपत्र दाखल करण्यात आले आहे. सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## खेड (जि.रत्नागिरी) येथील ज्ञानदीप विधी महाविद्यालयास मंजूरी मिळणेबाबत

**(३७) ४७८०१ (०५-०७-२०१९). श्री.अनिकेत तटकरे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ज्ञानदीप शिक्षण प्रसारक मंडळ, खेड (जि.रत्नागिरी) संचलित ज्ञानदीप विधी महाविद्यालय, मोरवंडे-बोरज, ता.खेड यांचा सन २०१९-२०२० या वर्षातला नवीन महाविद्यालय सुरु करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १० सप्टेंबर, २०१८ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सन २०१९-२०२० या वर्षाकरीता विद्यापीठनिहाय बिंदु निर्देशकांना मान्यता दिली असून खेडसाठी ३ वर्षीय अभ्यासक्रमासाठी

“एक बिंदु” मुंबई विद्यापीठामार्फत मंजूर करण्यात आला होता, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, दिनांक ३१ जानेवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णय क्रमांक मान्यता २०१९/(०१/२०१९) मशी-४ मध्ये खेडसाठी बिंदु मंजूर करण्यात आला असून कोणत्याही विधी महाविद्यालयाच्या नावाचा समावेश नाही तसेच ज्ञानदीप शिक्षण प्रसारक मंडळाच्या खेड या संस्थेचा प्रस्ताव परिपूर्ण असतानासुध्दा दिनांक ३१ जानेवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयात त्याचा समावेश करण्यात आला नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर संस्थेच्या ज्ञानदीप विधी महाविद्यालयास परवानगी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०९-०८-२०१९) :** (१) होय.
(२) होय.
(३) व (४) शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० करीता सदर महाविद्यालयाचा एकमेव प्रस्ताव विद्यापीठामार्फत शासनास शिफारशीत झाला होता. तथापि, सदर प्रस्ताव शासन निर्णय दिनांक १५/०९/२०१७ मधील निकषांची पुर्तता करीत नसल्याने प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शेतकऱ्यांचे अनुदान प्रस्ताव राष्ट्रीय फलोत्पादन मंडळाने रद्द केल्याबाबत

**(३८) ४८०७८ (०५-०७-२०१९). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **फलोत्पादन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सातबारा कोरा नसल्याच्या कारणावरुन मावळ (जि.पुणे) तालुक्यातील व राज्यातील इतर भागातील शेतकऱ्यांना राष्ट्रीय फलोत्पादन मंडळाने

शेतकऱ्यांचे अनुदान प्रस्ताव माहे मार्च, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान रद्द केले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मंडळातील अधिकारी व दलालांना गैरव्यवहार करता यावा म्हणून विविध कारणांमुळे प्रस्ताव नाकारले जात असल्याच्या तक्रारी शेतकऱ्यांनी केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने संबंधितावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयदत्त क्षीरसागर (०४-१०-२०१९) :** (१) हे खरे आहे. केंद्र शासनाच्या अखत्यारितील राष्ट्रीय बागवानी बोर्डाच्या मार्गदर्शक सूचनानुसार अनुदान प्रस्ताव सादर करताना जमीन वेगवेगळया योजनेच्या कारणास्तव बँक व इतर ठिकाणी गहाण ठेवण्यात आलेली नसावी.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) राष्ट्रीय बागवानी मंडळास यासंदर्भात तक्रार प्राप्त न झाल्याने चौकशी करण्याचा किंवा विलंबाचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांतील बदली कर्मचाऱ्यांना सेवेत कायम करण्याबाबत

**(३९) ४८३७१ (०५-०७-२०१९). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांतील २९ दिवसांच्या बदली कर्मचाऱ्यांना सेवेत कायम करण्यात यावे, या मागणीसाठी कर्मचाऱ्यांनी दिनांक ५ मार्च, २०१९ पासून संप पुकारला असून वैद्यकीय सेवेवर विपरीत परिणाम झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने बदली कर्मचाऱ्यांना सेवेत कायम करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१३-०८-२०१९) :** (१) २९ दिवसांच्या बदली कर्मचाऱ्यांनी सेवेत कायम करण्यात यावे, या मागणीसाठी संप पुकारला होता. परंतु सफाईगाराची कामे बाहयस्त्रोतामार्फत करण्यात येत असल्याने तसेच आंदोलनाच्या वेळी पर्यायी व्यवस्था केली असल्यामुळे संपाचा वैद्यकीय सेवेवर विपरीत परिणाम झाला नाही.

(२) संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या विविध संस्थांमधील बदली कर्मचाऱ्यांच्या पात्रता तपासून शासनास प्रस्ताव सादर करण्याचे संचालनालयास कळविण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विविध देवस्थानामध्ये काम करणाऱ्या पुजाऱ्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

**(४०) ४८५०२ (०६-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासनाच्या नियंत्रणाखालील काही देवस्थानामध्ये पुजारी म्हणून काम करणाऱ्या पुजाऱ्यांना शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे सहाव्या वेतन आयोगानुसार वेतन व भत्ते दिले जात असून काही देवस्थानामध्ये कंत्राटी स्वरुपात पुजारी म्हणून काम करणाऱ्या पुजाऱ्यांना ठोक मासिक मानधन दिले जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या देवस्थानांची नावे काय असून ठोक मासिक मानधन किती दिले जाते तसेच स्थानिक पातळीवरील देवस्थानांच्या उत्पन्नाप्रमाणे त्याठिकाणी कार्यरत असणाऱ्या पुजाऱ्यांना मानधन दिले जाते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पुजाऱ्यांना योग्य मानधन देण्याबाबत व त्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत शासनाने धोरणात्मक निर्णय घेण्याबाबत कोणती कार्यवाही

केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०८-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) श्री साईबाबा संस्थान शिर्डी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई, श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिर, पंढरपूर येथील पुजाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगानुसार वेतन व भत्ते दिले जातात. देवस्थान व्यवस्थान समिती पश्चिम महाराष्ट्र कोल्हापूर या समितीच्या आस्थापनेवरील पुजाऱ्यांना वेतन आयोगानुसार वेतन व भत्ते दिले जातात. तसेच या समितीच्या अधिपत्याखालील असलेल्या इतर देवस्थानातील पुजाऱ्यांना त्या त्या देवस्थानाचे उत्पन्न विचारात घेवून ठोक मासिक मानधन दिले जाते.

श्री तुळजाभवनी मंदिर संस्थानातील पुजाऱ्यांना दान पेटीतील जमा रक्कमेतील १/३ हिस्सा मावेजा म्हणून देण्यात येत होता. तथापि, सन २०१५ पासून या देवस्थानातील पुजाऱ्यांना मा.न्यायालयाच्या आदेशावरुन कोणतेही वेतन अथवा ठोक रक्कम अथवा मावेजा देण्यात येत नाही.

(३) शासन नियंत्रणाखालील देवस्थानासाठी व्यवस्थापन निधी स्थापन करुन हा निधी त्या त्या देवस्थानाच्या व्यवस्थापन समितीच्या अखत्यारित असतो. अशा देवस्थानातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते देवस्थानाच्या उत्पन्नावर अवलंबून असून अधिकारी/कर्मचारी/पुजारी यांच्या वेतनासंदर्भात निर्णय घेण्याचा अधिकार संबंधित व्यवस्थापन समितीस आहे. याबाबत शासनस्तरावरुन निर्णय घेतला जात नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे जिल्हयातील वन विभागाच्या जमिनीवर अतिक्रमणे असल्याबाबत

**(४१) ४८५२० (०५-०७-२०१९). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्हयातील वन विभागाच्या जमिनीवर ४२ हजार अतिक्रमणे आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागरी भागातील वन विभागाच्या जमिनीवर सन २०११ पूर्वी

उभारण्यात आलेल्या झोपड्यांचे पुनर्वसन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, ठाणे शहरातील अंदाजे ५० हेक्टर जमिनीवर अतिक्रमणे असून त्यापैकी १० हेक्टर जमिनीवर पुनर्वसन करुन उर्वरित ४० हेक्टर जमिनीवर ग्रीन झोन तयार करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे.

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२३-०७-२०१९) :** (१) ठाणे जिल्हयातील ठाणे वन विभागात सुमारे ४२ हजार अतिक्रमणे अस्तित्वात असून बहुतांशी वनक्षेत्र हे शहरी नागरी क्षेत्राच्या लगत आहे. तसेच शहापूर वन विभागात सुमारे ११०८ एवढी अतिक्रमणे आहेत.

(२) व (३) मा.उच्च न्यायालय, मुंबई मध्ये दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्र. १, ३५, ३६/२००७ मध्ये दिनांक १०/०६/२०१० रोजी ठाणे जिल्हयातील सार्वजनिक जमिनीवरील (राज्य शासनाच्या व स्थानिक स्वराज्य संस्थेच्या जमिनीवरील) अतिक्रमणे/बांधकामे निष्कासित करण्याचे आदेश पारित केले आहेत.

ठाणे वन विभागाच्या अखत्यारितील वन जमिनीवरील अतिक्रमण मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे आदेशानुसार निष्कासित करण्यात येत आहेत. अतिक्रमित झोपड्यांच्या निष्कासनानंतर त्यांच्या पुनर्वसनाचे धोरण वन विभागाच्या विचाराधीन नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र लोकसेवा आयोग मधील अध्यक्षपदासह सदस्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(४२) ४८५२२ (१०-०७-२०१९). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामध्ये पाच सदस्य आणि अध्यक्ष अशी

आयोगाची रचना असून सदर आयोगामध्ये सध्या दोनच सदस्य असून त्यापैकी चंद्रशेखर ओक यांच्याकडे प्रभारी अध्यक्षपद आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आयोगात दोनच सदस्य असल्याने मुलाखतींमध्ये बराच वेळ जातो व त्याचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या विविध परीक्षा आणि निकालांवरही परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन महाराष्ट्र लोकसेवा आयोगामधील अध्यक्षपदासह सदस्यांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०९-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे अंशत: खरे आहे.
(३) व (४) मा.सर्वोच्च न्यायालयाने पंजाब राज्य विरूध्द सलील सबलोक व इतर यांच्या दिवाणी अपील क्र. ७६४०/२०११ मध्ये दिनांक १५/०१/२०१३ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने तत्कालिन मा.राज्यपाल महोदयांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांच्या निवड व नियुक्तीबाबतची मार्गदर्शक तत्वे निर्गमित करण्याचे निदेश दिले आहेत. सदर निदेशाच्या अनुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांच्या निवड व नियुक्तीबाबतची मार्गदर्शक तत्वे निर्गमित करून आयोगाचे अध्यक्ष व सदस्यांची रिक्त पदे तातडीने भरण्याची कार्यवाही सुरू आहे.

---

## पुसद येथील लघु पाटबंधारे विभाग स्थलांतरीत होत असल्याबाबत

**(४३) ४८५५० (०५-०७-२०१९). डॉ.वजाहत मिर्झा, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुसद (जि.यवतमाळ) तालुक्यातील लघु पाटबंधारे विभाग स्थलांतरीत करण्यात येणार असल्याची बाब माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान

निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लघु पाटबंधारे विभाग स्थलांतर करण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, पुसद तालुक्यातील लघु पाटबंधारे विभाग जिल्ह्याच्या ठिकाणी स्थलांतरीत न करता सिंचन व्यवस्थापन विभागात रूपांतरीत करून पुसद येथेच ठेवावे अशी तेथील नागरिकांची मागणी आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन तेथील नागरिकांच्या मागणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-१०-२०१९) :** (१) ते (४) होय, हे अंशत: खरे आहे.
जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयाचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्याच्या अनुषंगाने प्रदेश/मंडळ/ विभाग/उपविभाग व शाखा निहाय कार्यालयातील कामाचे स्वरूप, त्याबाबत आवश्यक मनुष्यबळ व सुरू/प्रस्तावित कामांचा आढावा घेवून आवश्यक व अनावश्यक कार्यालये स्थलांतरीत/वर्ग/बंद करण्याचे विचाराधिन आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील ओलिताखालील क्षेत्राचे सर्वेक्षण होण्याबाबत

**(४४) ४८५६३ (०५-०७-२०१९). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामदास आंबटकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील डोंगर-दऱ्या, पठारे आदी ठिकाणच्या ओलिताखालील क्षेत्राचे प्रथमच सेटेलाईट मॅपिंग एरिएल फोटोग्राफी तसेच ड्रोनच्या सहाय्याने अत्याधुनिक सर्वेक्षण होणार असल्याची बाब माहे मे, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यामुळे दुष्काळी परिस्थितीवर कायमस्वरुपी मात करता यावी

म्हणून पाण्याचा उपलब्ध साठा आणि त्याचा वापर याचा सविस्तर आराखडा तयार करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दुष्काळी भागातील मोठी धरणे, तलाव, नदी, ओढयावरील बंधारे, पाझर तलाव व जलयुक्त शिवार योजनेतील साखळी बंधारे यांचाही या आराखड्यात समावेश करणार आहेत काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१४-१०-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) संपूर्ण राज्यात दुष्काळी भागातील मोठी धरणे, तलाव, नदी ओढयावरील बंधारे पाझर तलाव व जलयुक्त शिवार योजनेतील साखळी बंधारे यांचाही या आराखड्यात समावेश करणार आहेत.

(४) सदर कामाचे D.P.R. सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रामध्ये अभय योजना लागू करण्याबाबत

**(४५) ४८६४७ (१२-०७-२०१९). श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील मालमत्ता कर आणि त्यावरील शास्ती (व्याज) सद्य:स्थितीत २१०० कोटींवर गेले असून यावर पर्याय म्हणून महापालिकेने जलद मालमत्ता कर वसुल करण्यासाठी अभय योजना लागू करण्याचा प्रस्ताव शासनाकडे माहे फेब्रुवारी, २०१९ च्या तृतीय सप्ताहात पाठविल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अभय योजनेला शासनाने केव्हापासून मान्यता दिली आहे व त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०७-२०१९) :** (१) व (२) नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रात अभय योजना लागू करण्यासंदर्भात महासभेने ठराव क्र. १०४१, दि.०९/०४/२०१९ अन्वये पारीत केलेला आहे.

सदर ठरावास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम १५२-अ अन्वये शासनाची मान्यता मिळणेकरीता दिनांक १५/०५/२०१९ रोजी प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

नवी मुंबई महानगरपालिकेत अभय योजना लागू करण्यासंदर्भात प्राप्त प्रस्तावाची कायद्यातील तरतूदीनुसार तपासणी करून आवश्यक तो निर्णय घेण्याची तजवीज ठेवण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यातील लघुसिंचन प्रकल्पाबाबत

**(४६) ४८७५५ (०५-०७-२०१९). ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ, ठाणे अंतर्गत ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्ह्यातील ११३ योजनांची कामे प्रगतीपथावर असून २४ योजनांची भूसंपादन प्रक्रिया चालू असल्याने क्षेत्रियस्तरावर प्रत्यक्ष कामास सुरुवात झालेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त योजनांपैकी किती व कोणत्या योजनांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त झाली नाही तसेच अन्य कोणत्या कारणामुळे कोणत्या योजनांची कामे बंद आहेत,

(३) असल्यास, सदरहू योजनांची सद्य:स्थिती काय आहे तसेच प्रकल्पातील प्रकल्पग्रस्तांना नुकसान भरपाई दिली नसून ती कधीपर्यंत देण्यात येईल,

(४) उक्त प्रकल्पांसाठी एकूण किती निधीची आवश्यकता आहे व सदरहू कामे किती कालावधीत पूर्ण करण्यात येतील ?

**डॉ. तानाजी सावंत (१५-१०-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यात १४७ योजना प्रगतीपथावर असून त्यापैकी ५४ कामे भूसंपादन व वनजमीन इ. कारणांमुळे प्रत्यक्ष सुरु झालेली नाही.

(२), (३) व (४) ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांतील ३६ योजनांना प्रशासकीय मान्यता प्राप्त नाही. सदर योजनांची भूसंपादन प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पग्रस्तांना नुकसान भरपाई देण्याची कार्यवाही करण्यात येईल. सद्य:स्थितीत या जिल्ह्यांतील १४७ योजनांसाठी रुपये ९१७.७२ लक्ष निधीची आवश्यकता असून निधी उपलब्धतेनुसार सदर कामाबाबत पुढील कार्यवाही करण्यात येईल.

---

## कोकणासाठी स्वतंत्र पर्यटन विकास महामंडळ स्थापन करण्याबाबत

**(४७) ४८७६० (०५-०७-२०१९). ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोकणासाठी स्वतंत्र पर्यटन विकास महामंडळ स्थापन करण्याची घोषणा मा.मुख्यमंत्री व मा.पर्यटन मंत्री यांनी सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर महामंडळ स्थापन होऊन कार्यान्वित झाले काय,

(३) नसल्यास, त्याची कारणे काय आहेत व ते कधीपासून कार्यान्वित करण्याचा शासनाचा विचार आहे ?

**श्री.जयकुमार रावल (०३-१०-२०१९) :** (१) मा.मुख्यमंत्री महोदयांनी घोषणा केली होती, हे खरे आहे.

(२) व (३) राज्याच्या पर्यटनाच्या वाढीसाठी पर्यटन विकासाचे प्रकल्प राबविण्याच्या दृष्टीने पर्यटन संचालनालय स्थापन करण्यात आले असून कार्यान्वित करण्यात आले आहे, त्यामुळे पर्यटन संचालनालयामार्फत कोकण

पर्यटनास चालना देण्यात येणार आहे.

---

## मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील हजारो झाडे-झुडपे विनापरवानगी तोडण्यात आल्याबाबत

**(४८) ४८७८३ (०५-०७-२०१९). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) सर्व्हे नंबर ८९/१७, ९०/१, ९४/२, ९२/१० व १०० या श्री.दिपक शांताराम बेर्डे यांच्या मालकीच्या जमिनीवर परवानगी शिवाय रस्ता करुन हजारो उपयोगी व जळाऊ झाडे-झुडपे तोडून नुकसान केल्याची बाब माहे मार्च, २०१८ मध्ये केलेल्या तक्रारीनुसार वन विभागाने श्री.अनिल कांबळे यांचेविरुध्द दंडात्मक कारवाई केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दंडाची रक्कम जमा केली नसल्याने तसेच दंड आदेशावर मुदतीत अपिल न केल्यामुळे श्री.अनिल कांबळे यांच्या स्थावर मालमत्तेवर रेंज विनापरवाना झाडतोड रजि.क्र.१५/२०१८-१९ रत्नागिरी, दिनांक ३१ जुलै, २०१८ अन्वये बोजा चढविण्याबाबत उपविभागीय अधिकारी, महसूल विभाग, रत्नागिरी यांनी तहसिलदार, संगमेश्वर (देवरुख) यांना दिनांक २ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास कारवाई करण्याबाबत कळविण्यात आले असतानाही कोणतीही कारवाई केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन चौकशीच्या अनुषंगाने संबंधित दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) तसेच, तोडण्यात आलेली झाडे जमिनी मालकांच्या ताब्यात देण्यात आली आहेत काय, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२४-०७-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) याप्रकरणी महसूल विभागाचे अहवालानुसार लोकसभा २०१९ निवडणुकीसाठी मंडळ अधिकारी व तलाठी यांची नियुक्ती निवडणूक कामासाठी झालेली असल्याने त्यांना निवडणुकीची कामकाज करावे लागले.

निवडणूक कामकाज संपलेले असल्याने मंडळ अधिकारी व तलाठी यांना नोंद घेणेबाबत सक्त ताकीद देणेत आलेली आहे.
(३) व (४) वृक्ष अधिकारी, रत्नागिरी यांनी योग्य चौकशी करुन महाराष्ट्र वृक्षतोड (विनियमन) अधिनियम, १९६४ सुधारणा १९९२ अन्वये आवश्यक दंडात्मक कारवाई केलेली आहे.

---

## आमगांव (ता.वाडा, जि.पालघर) येथील आश्रमशाळेच्या नवीन इमारतीच्या प्रस्तावाला मंजूरी देण्याबाबत

**(४९) ४९१४१ (०६-०७-२०१९). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आमगांव (ता.वाडा, जि.पालघर) येथील आश्रमशाळेच्या नवीन इमारतीच्या प्रस्तावाला मंजूरी देण्याच्या मागणीचे निवेदन ‘समर्थन’ संस्थेने दिनांक २० मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास मा.मंत्री, आदिवासी विकास, प्रधान सचिव, आदिवासी विकास, अपर आयुक्त, आदिवासी विकास व अपर मुख्य सचिव, वित्त व नियोजन विभाग यांच्याकडे दिले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आश्रमशाळेच्या नवीन इमारतीसाठी सन २०१९-२० या वर्षासाठी किती रक्कमेच्या तरतूदीस मंजूरी देण्यात आली आहे,
(३) असल्यास, शालेय इमारतीचे बांधकाम सुरू करून किती कालावधीत पूर्ण करण्याचे अपेक्षित आहे व त्याची सद्य:स्थिती काय आहे,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार कोणता निर्णय घेण्यात आला व घेतलेल्या निर्णयाचे स्वरुप काय आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अशोक उईके (०९-०८-२०१९) :** (१) होय.
(२) आमगाव ता.वाडा येथील नवीन इमारत बांधकामास दिनांक ८ ऑक्टोबर, २०१८ च्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सन २०१९-२० या वर्षासाठी रुपये २.०० कोटींची तरतूद करण्यात आलेली आहे.
(३) व (४) सदर कामाची निविदा प्रक्रिया विभागीयस्तरावर अंतिम टप्प्यात असून कार्यारंभ आदेश दिल्यानंतर २४ महिन्याच्या आत बांधकाम पूर्ण

करण्याचे नियोजन आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सातव्या वेतन आयोग बक्षी कमिटीने केलेल्या शिफारशीबाबत

**(५०) ४९३३७ (२९-०८-२०१९). श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासकीय कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगातील शिफारशींचा अभ्यास करून त्या आयोगाचे लाभ देण्यासाठी तसेच वेतन त्रुटी अहवाल खंड-२ देण्यासाठी माजी सनदी अधिकारी के. पी. बक्षी यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या समितीने अद्याप वेतन त्रुटी अहवाल खंड-२ सादर न केल्यामुळे शासनाच्या पशुसंवर्धन, वैद्यकीय शिक्षण, माहिती व जनसंपर्क, उच्च व तंत्र शिक्षण विभागातील तंत्र निकेतन, वस्तू व सेवा कर (जीएसटी) अशा विविध विभागातील सुमारे ४० हजार अधिकारी / कर्मचारी यांचा सुधारित वेतनाचा प्रश्न मार्गी लागलेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या समितीकडून अहवाल प्राप्त करून घेवून अहवालातील शिफारसींनुसार शासनाने विविध विभागातील अधिकारी / कर्मचारी यांना सुधारित वेतनाचा लाभ देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०१-१०-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) बक्षी समितीने केंद्रीय सातव्या वेतन आयोगाच्या धर्तीवर राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनसंरचनेच्या शिफारशींबाबतचा आपला अहवाल खंड-१ शासनास दिनांक ५ डिसेंबर, २०१८ रोजी सादर केला आहे. या अहवालातील शिफारशीं शासनाच्या मान्यतेने स्वीकारण्यात येऊन, त्यानुसार राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना त्यांच्या सहाव्या वेतन आयोगातील असुधारित वेतनसंरचनाना अनुसरून सातव्या वेतन आयोगाच्या सूधारित वेतनसंरचना मंजूर केल्या आहेत.

समितीकडे ऑनलाईन पध्दतीने नोंदविलेल्या त्रुटी व अन्य वेतनवृध्दीविषयक मागण्यासंदर्भात केलेल्या शिफारशीचा अहवाल खंड-२ समितीने शासनास दिनांक २८ ऑगस्ट, २०१९ रोजी सादर केला आहे. समितीच्या खंड-२ मधील शिफारशींबाबत शासनाने समितीकडून अधिक स्पष्टीकरण मागविले आहे, समितीकडून स्पष्टीकरण प्राप्त झाल्यानंतर त्यावर मंत्रिमंडळाच्या मान्यतेने पुढील कार्यवाही करण्यात येईल.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेंद्र भागवत**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.